**चारायुक्त शिवार या कार्यक्रमाच्या राज्यातील अंमलबजावणीची रूपरेषा निश्चित करणे व योजनेच्या अंमलबजावणीस सहाय्य करण्यासाठी उच्चस्तरीय समितीचे गठण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीआर- २०१७/ प्र.क्र.१५३/ पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ जुलै, २०१७

**प्रस्तावना :-**

सुयोग्य वैरण विकास उत्तेजनाद्वारे राज्यात कृषि व दुग्धव्यवसाय वाढीस मोठा वाव आहे. यामुळे राज्याच्या दुध उत्पादनात वाढ होवून ग्रामीण भागातील शेतक-यांच्या आर्थिक उत्पनात वृध्दी आणि हरित महाराष्ट्र निर्मितीसाठी निश्चितच मदत होणार आहे. वर्धा जिल्ह्यातील आर्वी तालुक्यामध्ये वैरण संचयनीचा पथदर्शी प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीद्वारे ही बाब अधोरेखित झाली आहे.

या पाश्वभूमीवर चारायुक्त शिवार या कार्यक्रमाची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात चारायुक्त शिवार या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने रूपरेषा निश्चित करणे व योजनेच्या अंमलबजावणीस सहाय्य करण्यासाठी मा.मंत्री (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्यास याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग) | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | सचिव (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग) | पदसिध्द सदस्य सचिव |
| ३ | सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई | पदसिध्द सदस्य |
| ४ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | पदसिध्द सदस्य |
| ५ | आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास,महाराष्ट्र राज्य, मुंबई. | पदसिध्द सदस्य |
| ६ | आयुक्त, कृषि विभाग, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे | पदसिध्द सदस्य |
| ७ | श्री.गिरीष सोहनी, अध्यक्ष, बायफ, पुणे | तज्ञ सदस्य |
| ८ | डॉ.सतिश राजू, सहाय्यक आयुक्त तथा व्यवस्थापक, वळु संगोपन केंद्र, नागपूर आणि प्रकल्प संचालक- विदर्भ मराठवाडा विशेष दुग्ध प्रकल्प | तज्ञ सदस्य |
| ९ | डॉ.एम.एफ.सिद्दीकी, सहयोगी प्राध्यापक, एल.पी.एम., पशुवैद्यकीय महाविद्यालय, परभणी | तज्ञ सदस्य |
| १० | डॉ.अनिरूध्द पाठक, पशुधन विकास अधिकारी, आर्वी, जि.वर्धा | तज्ञ सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ११ | डॉ.प्रविण भालेराव, सहाय्यक प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, वर्धा आणि मा.श्री.नितीनजी गडकरी यांचे विशेष कार्यकारी अधिकारी | तज्ञ सदस्य |
| १२ | प्राध्यापक ए.एच.सोनोने, फॉरेज ब्रीडर आणि प्रभारी अधिकारी, ए.आय.सी.आर.पी. ऑन फॉरेज क्रॉप्स, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी | तज्ञ सदस्य |
| १३ | डॉ.पी.पी.सुराणा, संशोधन अधिकारी, ग्रास ब्रिडींग स्कीम, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी | तज्ञ सदस्य |

**समितीची कार्यकक्षा -**

१. चारायुक्त शिवार योजना महाराष्ट्रात राबविण्यासाठी कालबध्द कृती आराखडा तयार करणे. त्यामध्ये खालीलबाबींचा अंतर्भाव करणे.

अ) सद्यस्थितीतील महाराष्ट्रातील वैरण उत्पादन व उपलब्धतेबाबतचा सविस्तर तपशील.

ब) समाजातील घटक, शासन, नागरी संस्था यांच्या सहभागाने देशपातळीवर राबविण्यात आलेल्या अन्य यशस्वी चारायुक्त शिवार योजनांची फलश्रुती, योजनेत अंतर्भूत बाबी योजनेच्या अंमलबजावणीसाठी निश्चित करण्यात आलेली संरचना व कार्यपध्दती तसेच निधी उपलब्धता याबाबतचा अभ्यास अहवाल.

क) योजना राबविण्याचा कालबध्द कार्यक्रम

२. प्रस्तावित योजनेसाठी आवश्यक निधीचा अंदाज बांधणे.

३. निधी उभारणीसाठी विविध पर्याय सुचविणे.

४. या योजनेच्या अंमलबजावणीदरम्यान उपस्थित होणा-या कायदेशीर बाबी ( legal issues) व त्याबाबतचे कायदेशीर निराकरण याची व्याप्ती निश्चित करणे.

५. योजनेसाठी मनुष्यबळाची आवश्यकता निश्चित करणे.

६. योजना अंमलबजावणी संदर्भात सविस्तर मॉडेल विकसित करणे.

७. प्रमुख सुचकांक व संनियंत्रण यंत्रणा निश्चीत करणे, विस्तृत प्रमाणात माहितीचे संकलन व संनियंत्रण तसेच, लाभार्थीकडील योजनेच्या अंमलबजावणीबाबत नियमित आढावा घेणेस्तव तंत्रज्ञानाचा वापर करणे.

८. योजनेत संपूर्ण पारदर्शकता आणण्यासाठी तसेच सर्व नागरिकांना या योजनेत लाभ मिळणेसाठी ॲप विकसित करणे.

९. योजनेत अंतर्भूत / समाविष्ट समाजातील घटकांची कर्तव्ये आणि जबाबदारी निश्चित करणे.

१०. या योजनेशी साधर्म्य असणा-या तसेच योजनेस पूरक ठरू शकणा-या अन्य विभागांच्या अस्तित्वातील योजनांचा शोध घेणे व त्याद्वारे, संबंधित विभाग आणि त्या विभागाच्या योजनांचा सहभाग प्रस्तावित योजनेत घेण्याबाबत अभ्यास अहवाल तयार करणे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०७२९१३२३५९६८०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.07.29 13:30:01 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
७. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे- ६७
८. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. आयुक्त, कृषि विभाग, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे
१०.श्री.गिरीष सोहनी, अध्यक्ष, बायफ, पुणे
११.डॉ.सतिश राजू, सहाय्यक आयुक्त तथा व्यवस्थापक, वळु संगोपन केंद्र, नागपूर आणि प्रकल्प संचालक- विदर्भ मराठवाडा विशेष दुग्ध व्यवससाय प्रकल्प
१२.डॉ.एम.एफ.सिद्दीकी, सहयोगी प्राध्यापक, एल.पी.एम., पशुवैद्यकीय महाविद्यालय, परभणी
१३.डॉ.अनिरूध्द पाठक, पशुधन विकास अधिकारी, आर्वी, जि.वर्धा
१४.डॉ.प्रविण भालेराव, सहाय्यक प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, वर्धा आणि मा.श्री.नितीनजी गडकरी यांचे विशेष कार्यकारी अधिकारी
१५.प्राध्यापक ए.एच.सोनोने, फॉरेज ब्रीडर आणि प्रभारी अधिकारी, ए.आय.सी.आर.पी. ऑन फॉरेज क्रॉप्स, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी
१६.डॉ.पी.पी.सुराणा, संशोधन अधिकारी, ग्रास ब्रिडींग स्कीम, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी
१७.निवड नस्ती पदुम -४.